<u>निवडसूची-२०१२</u>
गट-'क' पदसमूह-२ मधून उप अधिक्षक भूमि अभिलेख गट- 'ब' संवर्गात तात्पूरती पदोन्नतीने <u>नियुक्ती देण्याबाबत......</u>

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग,**

**शासन आदेश क्रमांक : आस्था-२०१६/९४३/प्र.क्र.१५६/ई-६**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक : २८ ऑक्टोबर,२०१६

<u>वाचा</u> : १) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख (म.रा.) पुणे यांचे पत्र क्र. आस्था/प्र.क्र.५३५/२०१/आ-१, दिनांक २८.०७.२०१६

२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख (म.रा.) पुणे यांचे पत्र क्र. आस्था/ प्र.क्र.६६८/२०१६/आ-१, दिनांक ०६.०९.२०१६

<u>शासन आदेश</u> :-

भूमी अभिलेख विभागातील गट-क पदसमूह-२ संवर्गामधून उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब संवर्गामध्ये पदोन्नती बाबत निवडसूची-२०१२ च्या विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या वेळी श्री. नारायण विठोबा काळे हे शिक्षा अंमलाखाली असल्याने, श्री. काळे यांचे नाव मोहोरबंद ठेवून त्यांना निवडसूचीतून वगळण्यात आले होते. श्री. काळे यांनी गट-ब संवर्गामध्ये पदोन्नती न मिळाल्याने मा. महाराष्ट्र प्रशासकिय न्यायाधिकरण, मुंबई येथे मुळ अर्ज क्र.४८९/२०१५ दाखल केला. मा. न्यायाधिकरणाने सदर मुळ अर्ज क्र.४८९/२०१५ मध्ये दिनांक ३०.०६.२०१६ रोजी आदेश पारित केलेले असून, सदर आदेशामध्ये मा. न्यायाधिकरणाने “ प्रतिवादी यांना असे निर्देश देण्यात येते की, अर्जदार यांचा मोहरबंद लिफाफा उघडावा व अर्जदाराचे प्रकरण पदोन्नतीसाठी ग्राह्य धरण्यात यावे. जर अर्जदार हे हे पदोन्नतीसाठी योग्य आढळून आल्यास त्यांना उप अधीक्षक भूमी अभिलेख या पदावर पदोन्नती देण्यात यावी. याची पुर्तता आजपासून दोन महिन्याच्या आत करावी.”

२. मा. न्यायाधिकरणाच्या आदेशाच्या अनुषंगाने जमाबंदी आयुक्त, पुणे यांनी संदर्भ क्र. १ नुसार श्री. वाडेकर यांच्यावरील शिक्षा अंमल दिनांक ३०.०६.२०१६ रोजी संपलेला असल्याने, श्री. काळे यांना निवडसूची-२०१२ मध्ये उप अधीक्षक भूमी अभिलेख गट-ब संवर्गामध्ये पदोन्नती देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

३. त्यानुषंगाने भूमि अभिलेख विभागातील गट-'क' पदसमूह-२ या संवर्गात कार्यरत असलेल्या श्री. नारायण काळे यांना उप अधिक्षक भूमि अभिलेख गट-'ब' (वेतनश्रेणी ९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) या संवर्गात स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदोन्नतीने पदस्थापना केलेले पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. नारायण विठोबा काळे, मुख्यालय सहाय्यक, उप अधीक्षक भूमी अभिलेख, राधानगरी, जि. कोल्हापूर | उप अधीक्षक भूमी अभिलेख, बिड, जि. बिड | रिक्त पदावर |

४. वर नमूद अधिकाऱ्यांस खालील अटींच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे :-

अ) सदर पदोन्नती मा. उच्च न्यायालय,मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट याचिका क्र. २७९७/२०१५ (महाराष्ट्र राज्य विरुद्ध श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणांमध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

ब) पदोन्नतीचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने या पदावर देण्यात आलेली पदोन्नती (निवडसूची) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमीत केल्यानंतरच सदर पदावर सेवाजेष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरतील.

क) सदर पदोन्नती ही वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे सेवेत ठेवण्याबाबतच्या तत्संबंधीच्या आदेशाच्या अधीन राहील.

ड) त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

५. सदर पदोन्नती ही " महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळ सेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम-२०१५" दिनांक २८.४.२०१५ मधील नियम ११ (२) व दिनांक १६.०७.२०१५ च्या सुधारणेनुसार महसूली विभाग वाटप करण्यात आलेले आहे.

६. पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यांनी उप अधीक्षक भूमी अभिलेख या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर त्या अधिकाऱ्यांची प्रचलित नियमानुसार वेतननिश्चिती करावी.

७. संबंधित वरिष्ठ अधिकाऱ्यांनी वरील पदोन्नत अधिकाऱ्यास पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी मूळ कार्यालयाने कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नविन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख, पुणे यांनी शासनास त्वरित अवगत करावे.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१६१०२८१२५३२८४५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2016.10.28 13:02:09 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२) उपसंचालक भूमि अभिलेख, पुणे, औरंगाबाद (द्वारा जमाबंदी आयुक्त,पुणे)

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र -१/२,मुंबई,नागपूर
४) संबंधीत कर्मचारी (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, म.रा.पुणे)
५) खाजगी सचिव, मा. मंत्री (महसूल) , मंत्रालय, मुंबई - ३२.
६) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (महसूल), मंत्रालय, मुंबई - ३२.
७) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवडनस्ती ई-६ कार्यासन, महसूल व वन विभाग.